गोपनीय/तात्काळ

राज्य शासकीय कर्मचा-यांचा दिनांक ४ सप्टेंबर १९८४ रोजीचा नियोजित संप.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
परिपत्रक क्रमांक एसटीके-१०८४/१७५२/सीआर-६४/सोळा-अ
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ३२ ऑगस्ट १९८४.

परिपत्रक

सरकारी/निमसरकारी कर्मचारी आणि शिक्षक संघटना, महाराष्ट्र राज्य यांच्या समन्वय समितीने दिनांक ४ सप्टेंबर १९८४ रोजी एक दिवसाचा लाक्षणिक संप करण्याचे राज्य शासकीय कर्मचा-यांना आवाहन केले आहे असे वृत्तपत्रीय बातम्यावरुन समजते. शासन सर्व कर्मचा-यांच्या असे नजरेस आणू इच्छिते की, ह्या संपात भाग घेण्याची कृति ही गैरवर्तणूक समजण्यात येईल व संपात भाग घेणा-या शासकीय कर्मचा-यांवर शिस्तभंग विषयक कार्यवाही करण्यात येईल. सर्व विभाग प्रमुख आणि कार्यालय प्रमुख यांनी त्यांच्या विभाग/कार्यालयातील कर्मचा-यांच्या माहितीस्तव वरील प्रमाणे सूचना/प्रति करणारे कार्यालयीन आदेश (Office Orders) तात्काळ काढावेत आणि ते संबंधीत कर्मचा-याचे नजरेस आणावेत त्याच प्रमाणे आदेशाची प्रत सर्व कर्मचा-यांच्या माहितीस्तव सूचना फलकावरही लावावी.

२. दिनांक ४ सप्टेंबर १९८४ रोजी सर्व शासकीय कार्यालये उघडण्यासाठी व बंद करण्याची योग्य ती उपाययोजना करण्यात यावी. तसेच या दिवशी शासकीय काम सुरु राहाण्यात कोणत्याही प्रकारचा अडथळा येणार नाही याचीही दक्षता घ्यावी.

३. सर्व मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख यांच्या वरील आदेश निदर्शनास आणून योग्यती कार्यवाही करण्याबाबत सूचना द्याव्यात अशी त्यांना विनंती करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

प्र. द. माळवे,
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत

मुख्य मंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव/सर्व राज्य मंत्र्यांचे स्वीय सहाय्यक,
शासनाचे सर्व सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
मंत्रालयाच्या विविध विभागांच्या नियंत्रणाखालील इतर सर्व विभागीय प्रमुख,

[कृ. मा. प.]

शामुमु-रोटा-साप्रवि-एच-४४१[४,०००-८-८४]

×प्रबंधक [मूळ न्याय शाखा] उच्च न्यायालय, मुंबई,
×प्रबंधक, उच्च न्यायालय [अपील शाखा], मुंबई,
×प्रबंधक, लोकायुक्त/उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग.

---

×प्रत पत्राद्वारे

---

एच-४४१[४,०००-८-८४]-अ